**जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील कार्यरत गट-क व गट-ड तांत्रिक व अतांत्रिक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबीसंदर्भात उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**परिपत्रक क्रमांक : न्यायाप्र-२२२२/प्र.क्र.३७/आस्था (अतांत्रिक)**
१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० फेब्रवारी, २०२२

वाचा :- १) जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र.सुमात २०१२/प्र.क्र.३०६/२०१२/आ.अतांत्रिक, दि.२१ मार्च, २०१३
२) जलसंपदा विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.७१/२०२०/आ(रवका), दि.१५ ऑक्टोबर, २०२०

**प्रस्तावना :**

जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील कार्यरत गट-क व गट-ड तांत्रिक व अतांत्रिक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबीसंदर्भात संबंधित कर्मचारी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ मुंबई/ औरंगाबाद/ नागपूर, मा.उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई/ औरंगाबाद/ नागपूर येथे विविध प्रकारचे दावे दाखल करीत असतात. सदर न्यायालयीन बाबींच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना क्षेत्रिय स्तरावरील अधिकाऱ्यांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन परिपत्रक :**

जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील कार्यरत गट-क व गट-ड तांत्रिक व अतांत्रिक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबीसंदर्भात संबंधित कर्मचारी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा मा.उच्च न्यायालयामध्ये विविध प्रकारचे न्यायालयीन दावे दाखल करीत असतात. अशा न्यायालयीन दाव्यामध्ये विभाग प्रमुख या नात्याने सचिव, जलसंपदा विभाग यांना प्रतिवादी क्र.१ करण्यात येते. जलसंपदा विभागातील क्षेत्रिय कार्यालयांतर्गत कार्यरत गट-क व गट-ड तांत्रिक व अतांत्रिक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बाबतीत नियुक्ती प्राधिकारी हे संबंधित मंडळाचे अधीक्षक अभियंता हे आहेत. गट-क व गट-ड तांत्रिक व अतांत्रिक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सर्व सेवाविषयक बाबी मंडळ/ परिमंडळ स्तरावरुन हाताळण्यात येतात. त्यामुळे अशा न्यायालयीन प्रकरणी शासन (जलसंपदा विभाग, मंत्रालय) नाममात्र प्रतिवादी असते. तथापि, अशा न्यायालयीन प्रकरणाचे कागदपत्रे शासनास प्राप्त न होणे, शासनाकडून शपथपत्र दाखल करण्यास प्राधिकृत करण्यात न येणे, शपथपत्र दाखल करण्यास

शासनाकडून प्राधिकृत करण्यात आल्यानंतर शपथपत्राचा मसुदा शासन मान्यतेसाठी सादर करणे, त्यामुळे शपथपत्र दाखल करण्यास विलंब होणे व अशा प्रकरणी न्यायालयाकडून शासनाविरुध्द ताशेरे ओढण्यात येतात अथवा संबंधित आवश्यक कागदपत्रे सादर न झाल्याने एकच बाजू विचारात घेऊन न्यायनिर्णय/ आदेश दिला जाण्याची शक्यता राहते. ही बाब विचारात घेऊन न्यायालयीन दावे/ प्रकरण हाताळण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१) न्यायालयीन प्रकरणी शासनाकडून शपथपत्र दाखल करण्यास प्राधिकृत केले नसले तरी संबंधित मंडळ कार्यालयाने शासनास अडचण होणार नाही अशाप्रकारे शपथपत्र दाखल करण्याची कार्यवाही विहित मुदतीत करावी. काही अडचणीमुळे विहित कालमर्यादेत शपथपत्र दाखल करणे शक्य नसल्यास मा.न्यायालयाकडून आवश्यकतेप्रमाणे मुदतवाढ घेण्यात यावी. तसेच शासनाकडून काही माहिती आवश्यक असेल तर ती तात्काळ मिळविण्याची आवश्यक ती दक्षता घ्यावी.

२) शपथपत्राचे प्रारुप/ परिच्छेदनिहाय अभिप्राय शासन मान्यतेसाठी सादर करण्यात येऊ नये. एखाद्या न्यायालयीन प्रकरणी मूळ अर्जातील ज्या धोरणात्मक मुद्यांच्या अनुषंगाने किंवा जो मुद्दा थेट शासन स्तरावरील कार्यवाहीशी संबंधित असेल व अशा प्रकरणी मा.न्यायाधिकरणाने तसे निर्देश दिले असेल अथवा मूळ अर्जातील बाबीमुळे शासनावर मोठा आर्थिक भार येणार असेल/ शासनाचे मोठे आर्थिक नुकसान होणार असेल, केवळ अशाच प्रकरणी शपथपत्राचे प्रारुप/ परिच्छेदनिहाय अभिप्राय (Para wise comments) शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत.

३) मा.उच्च न्यायालयात दाखल होणाऱ्या रिट याचिकेबाबत विधी व न्याय विभागाने तयार केलेल्या Rules for the Conduct of Legal Affairs of Government, १९८४ मधील नियम-५७ व ५८ नुसार प्रशासकीय विभागाकडे संदर्भ करणे आवश्यक असल्याने, असे प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावेत. असे प्रस्ताव सादर करतांना सदर कर्मचाऱ्यांचे पदनाम व कार्यालय, तसेच प्रकरण कशाच्या अनुषंगाने उद्भवले आहे (उदा.निवृत्तीवेतन, ज्येष्ठता, मानीव दिनांक, रजा, अनुकंपा नियुक्ती इ.) याबाबत सविस्तर माहिती नमूद करुन प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावेत.

४) न्यायालयीन प्रकरणी नियुक्त करण्यात आलेल्या सरकारी वकील/ सादरकर्ता अधिकारी यांच्याशी संपर्क साधून त्यांचे सल्ल्यानुसार समर्पक शपथपत्र तयार करुन ते आपल्या स्तरावरुन

मा.उच्च न्यायालय/ मा.न्यायाधिकरणामध्ये दाखल करण्यात यावे. न्यायालयीन प्रकरणात प्रतिवादी शासन असल्यास, उपरोक्त नमूद मुद्दा क्रमांक २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वस्तुस्थिती असल्यास शासनाच्यावतीने शपथपत्र दाखल करण्याची दक्षता घ्यावी.

५) शपथपत्र तयार करतांना मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी www.matmumbai.nic.in या संकेतस्थळावर दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करावे. प्रस्तुत प्रकरणी दाखल करावयाचे शपथपत्र हे वस्तुस्थितीशी तसेच शासनाच्या प्रचलित धोरणाशी सुसंगत राहील/ असेल याची व प्रचलित शासन निर्णय, परिपत्रके मार्गदर्शक तत्वे इत्यादीच्या आधारे शपथपत्र दाखल करून शासनाच्या हिताचे रक्षण होईल याची दक्षता घ्यावी.

६) न्यायालयीन प्रकरणी सक्षम अधिकाऱ्याची नियुक्ती करुन प्रकरणाच्या प्रत्येक सुनावणीच्या वेळी उपस्थित राहण्याच्या सूचना त्यांना देण्यात याव्यात. सदर अधिकाऱ्याने सुनावणीदरम्यान उपस्थित मुद्यांचे टिपण करावे. त्यातील मुद्दे शासनाशी प्रत्यक्ष संबंधित असल्यास तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणून देण्यात यावेत.

७) नियुक्त करण्यात आलेल्या सक्षम अधिकाऱ्याने वेळोवेळी होणाऱ्या सुनावणीमधील मा.न्यायालय/ मा.न्यायाधिकरण यांचे आदेश प्राप्त करुन घ्यावे व संबंधित अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणून द्यावे.

८) जबाबदार अधिकाऱ्याने सरकारी अभियोक्ता/ सरकारी वकील/ सादरकर्ता अधिकारी यांचेशी वेळोवेळी संपर्क साधून न्यायालयीन प्रकरणे निकाली काढली जातील, यादृष्टीने कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

९) संबंधित जबाबदार अधिकाऱ्याकडून न्यायालयीन प्रकरणांच्या अनुषंगाने उद्भवणाऱ्या इतर न्यायिक बाबी प्राथम्याने जबाबदारीने हाताळण्यात याव्यात.

१०) न्यायालयीन प्रकरणात शासनाकडे अनावश्यक पत्रव्यवहार टाळावा. शासनाकडे संदर्भ/ पत्रव्यवहार करतांना कोणत्या बाबीसंदर्भात मार्गदर्शन/ मान्यता हवी आहे, याचा स्पष्ट उल्लेख करावा.

११) गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबीसंदर्भात अधीक्षक अभियंता हे नियुक्ती प्राधिकारी असल्याने, सदर न्यायालयीन प्रकरणात उपरोक्तप्रमाणे विहित कालमर्यादेत कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित अधीक्षक अभियंता यांची असल्याने त्याप्रमाणे कार्यवाही न झाल्यास/ आकस्मिकता उद्भवल्यास त्यात पूर्णपणे संबंधित मंडळाचे अधीक्षक अभियंता यांना जबाबदार धरण्यात येईल.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०२१०१५४५०४४६२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0243d4781b79f364761efde22e15161622e87986fb431d9cbc0ecc6469d5e203, pseudonym=B7CEA6097CE466B1F4A70CFE42BA86A0C72E48E8, serialNumber=9A8B949B82C94F286DC79EF74BFCAE2A4E204E31853685E98B0B86C438C888E9, cn=ANIL VITTHAL DEOKATE
Date: 2022.02.10 15:47:03 +05'30'

**( अ.वि.देवकाते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. सर्व कार्यकारी संचालक
२. सर्व मुख्य अभियंता
३. सर्व अधीक्षक अभियंता
४. आस्था (अतांत्रिक) संग्रहार्थ.